सर्व शिक्षा अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीत करण्याबाबत....

केंद्र हिस्सा लेखाशिर्ष (२२०२ आय ४४१) व राज्य हिस्सा लेखाशिर्ष (२२०२ आय४५२)

महाराष्ट्र शासन.
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१८/ प्र.क्र. ०४ / कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ११ जानेवारी, २०१९.

**वाचा -**

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.
२) आदिवासी विकास विभाग समक्रमांक शासन निर्णय दि.६.०६.२०१८ व दि.१२.१०.२०१८
३) मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. एफ नं.७-१/२०१८-आयएस-१२ (एसटी), दि.२९.१०.२०१८
४) शालेय शिक्षण विभाग, नस्ती क्र. एसएसए-२०१८ /प्र.क्र.१५० भाग-तीन/एसडी-१.

**शासन निर्णय-**

सर्व शिक्षा अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र. टी-५, २२०२ , सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, ७९६ जनजाति क्षेत्र उपयोजना (०१) जनजाति क्षेत्र उपयोजना (०१) (०६) सर्व शिक्षा अभियान योजना ( ६० टक्के केंद्र हिस्सा ) लेखाशिर्ष (२२०२ आय४४१ ), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) करिता एकूण रु. ११२.५० कोटी तरतूद अर्थसंकल्पित आहे. तर त्यास समवर्ती राज्य हिस्सा म्हणून (०१) (०७) सर्व शिक्षा अभियान योजना ( ४० टक्के राज्य हिस्सा ) लेखाशिर्ष( २२०२ आय४५२ ) ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) करिता एकुण रु. ७५.०० कोटी तरतूद अर्थसंकल्पित आहे. यापैकी केंद्र हिस्स्यापोटी रु.५९.७८ कोटी ( रुपये एकोणसाठ कोटी अठ्ठयाहत्तर लाख ) इतका निधी तर त्यास समरुप राज्य हिस्सा म्हणून रु. ३९.८५ कोटी (रुपये एकोणचाळीस कोटी पंच्याऐंशी लाख फक्त ) इतका निधी संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयांन्वये अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आलेला आहे.

२. केंद्र शासनाने संदर्भीत क्र.३ येथील आदेशान्वये उपरोक्त योजनेंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता रु.३६९.३७ लाख इतका निधी वितरीत केला आहे. त्यानुषंगाने शालेय शिक्षण विभागाने वाचा क्र.४ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार या योजनेंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता (०१) (०६) सर्व शिक्षा अभियान योजना ( ६० टक्के केंद्र हिस्सा) (२२०२ आय४४१ ), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली रु.३६९.३७ लाख ( रुपये तीन कोटी एकोणसत्तर लाख सदोतीस हजार फक्त ) इतका निधी तर त्यास समरुप राज्य हिस्सा म्हणून (०१) (०७) सर्व शिक्षा अभियान योजना ( ४० टक्के राज्य हिस्सा) (२२०२ आय४५२ ) ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली रु.२४६.२४६६७ लाख ( रुपये दोन कोटी शेहचाळीस लाख, चोवीस हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार सदर निधी याच वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; तसेच आदिवासी विकास विभाग व शालेय शिक्षण विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रण अधिकारी/ विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात विविध योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५२८/ अर्थोपाय, दि.६/१२/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२०१२१८२७३८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2019.01.11 11:50:57 +05'30'

रविंद्र दि.औटे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ अमरावती.

५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
८. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.